**लोकसभा / विधानसभेच्या सार्वत्रिक/पोट निवडणुकीच्या वेळी मतदान / मतमोजणी कामासाठी नियुक्त केलेल्या अधिकाऱ्यांना /कर्मचाऱ्यांना द्यावयाच्या निवडणूक भत्त्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सीईएल-२०२४/प्र.क्र.१२७/२४/३३,**
मादाम कामा रोड, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ एप्रिल, २०२४

**वाचा :** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. सीईएल-२०१४/प्र.क्र.३०४/१४/३३, दिनांक १८ मार्च, २०१४

**प्रस्तावना :-**

भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारितीत लोकसभा/विधानसभा सार्वत्रिक/पोट निवडणुकांच्या कामासाठी नियुक्त करण्यात येणाऱ्या अधिकारी /कर्मचाऱ्यांना द्यावयाच्या निवडणूक भत्त्याचे दर शासनाच्या दिनांक १८.०३.२०१४ च्या संदर्भाधिन शासन निर्णयान्वये निश्चित केलेले आहेत. भारत निवडणूक आयोगाने त्यांचे पत्र क्रमांक ४६४/INST/EPS/२०२३/Remuneration & TA/DA, दिनांक ०६.०६.२०२३ व क्रमांक-४६४/INST/EPS /२०२३/Remuneration & TA/DA, दिनांक १७.११.२०२३ अन्वये निवडणूक कर्तव्यार्थ नियुक्त करावयाच्या कर्मचाऱ्यांना द्यावयाच्या निवडणूक भत्त्याच्या दरामध्ये व काही बाबीमध्ये सुधारणा करण्याबाबत निर्देश दिले आहेत. भारत निवडणूक आयोगाच्या सदर पत्रातील सूचनांना अनुसरुन राज्यातील लोकसभा /विधानसभा निवडणुकांच्या कर्तव्यार्थ नियुक्त करण्यात येणाऱ्या निवडणूक कर्मचाऱ्यांना द्यावयाच्या निवडणूक भत्त्याच्या अनुषंगाने सुधारणा करण्याचे शासनाच्या विचाराधिन होते. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

लोकसभा / विधानसभा सार्वत्रिक / पोट निवडणुकींच्या वेळी मतदान / मतमोजणीच्या कामासाठी नियुक्त केलेल्या अधिकाऱ्यांना / कर्मचाऱ्यांना देण्यात द्यावयाच्या निवडणूक भत्त्याबाबतचा दिनांक १८ मार्च, २०१४ रोजीचा संदर्भाधिन शासन निर्णय अधिक्रमित करुन भारत निवडणूक आयोगाच्या पत्र क्रमांक ४६४/INST/EPS/२०२३ /Remuneration & TA/DA, दिनांक ०६.०६.२०२३ व क्रमांक-४६४/INST/EPS/२०२३/Remuneration & TA/DA, दिनांक १७.११.२०२३ अन्वये देण्यात आलेल्या सूचनांना अनुसरुन महाराष्ट्र राज्यातील लोकसभा / विधानसभा सार्वत्रिक/पोट निवडणुकांच्या मतदान / मतमोजणी कर्तव्यार्थ नियुक्त करण्यात येणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांना पुढीलप्रमाणे निवडणूक भत्ता मंजूर करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकारी व कर्मचारी यांचे पदनाम | निवडणूक भत्त्याचा दर (रुपये) |
|---|---|---|
| १ | क्षेत्रिय दंडाधिकारी (क्षेत्रिय अधिकारी व्यतिरिक्त तैनात असल्यास) | रु.१५००/- (एकत्रित एकदा) |
| २ | मतदान केंद्राध्यक्ष / मतमोजणी पर्यवेक्षक | रु.३५०/- (प्रत्येक दिवसाकरीता किंवा दिवसाच्या भागाकरीता) |
| ३ | मतदान अधिकारी / मतमोजणी सहायक | रु.२५०/- (प्रत्येक दिवसाकरीता किंवा दिवसाच्या भागाकरीता) |
| ४ | चतुर्थश्रेणी कर्मचारी | रु.२००/- (प्रत्येक दिवसाकरीता किंवा दिवसाच्या भागाकरीता) |
| ५ | फिरते व्हिडीओ पथक,<br>व्हिडीओ निरिक्षण पथक,<br>लेखा पथक,<br>नियंत्रण कक्ष व कॉल सेंटर मधील कर्मचारी,<br>प्रसार माध्यमांना प्रमाणपत्र देणारी व देखरेख करणारी यंत्रणा,<br>फिरते पथक,<br>स्थिर देखरेख पथक (Static Surveillance Team), खर्च नियंत्रण सेल | वर्ग-१ / वर्ग-२ रु.१२००/- (एकत्रित एकदा)<br>वर्ग-३ रु.१०००/- (एकत्रित एकदा)<br>वर्ग-४, रु.२००/- (प्रत्येक दिवसाकरीता किंवा दिवसाच्या भागाकरीता) |
| ६ | आयकर निरिक्षक | रु.१२००/- (एकत्रित एकदा) |
| ७ | सूक्ष्म निरिक्षक | रु.१०००/- (एकत्रित एकदा) |
| | **आहार भत्ता** | |
| १ | मतदान केंद्र / मतमोजणी केंद्रावर निवडणूक कर्तव्य नियुक्त अधिकारी / कर्मचारी यांच्यासहीत पोलीस अधिकारी /कर्मचारी, मोबाईल पथके, होमगार्ड, वनरक्षक दल, ग्रामरक्षक दल, एनसीसी कॅडेटस, माजी सैनिक, स्वयंसेवक यांचे करीता भोजनाची पाकिटे किंवा सौम्य आहार | भोजनाची पाकीटे किंवा प्रत्येक दिवसाकरीता रु.१५०/- किंवा दिवसाच्या भागाकरीता |
| | TA / DA | |
| | **लाभार्थ्याची श्रेणी** | **दर** |
| | निवडणूक कर्तव्य नियुक्त अधिकारी / कर्मचारी | **१००% प्रवास भत्ता / दैनिक भत्ता रक्कम (TA/DA)**<br>**पद्धत-१:** TA/DA च्या १००% रक्कम एकतर निवडणूक कर्तव्य पूर्ण केल्याच्या २४ तासांच्या आत किंवा आगाऊ.<br>**पद्धत-२:** TA/DA च्या ८०% रक्कम आगाऊ आणि २०% रक्कम निवडणूक पूर्ण झाल्यानंतर ३० दिवसांच्या आत. |

(१) मतदान केंद्र / मतमोजणी केंद्रावर प्रत्यक्ष तैनात करण्यात आलेल्या पोलिस कर्मचाऱ्यांनाही वरील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे भत्त्याचे दर लागू राहतील.

(२) प्रशिक्षणासाठी उपस्थित राहणाऱ्या, मतदानाचे साहित्य ताब्यात घेणाऱ्या तसेच मतदान व मतमोजणीच्या दिवशी प्रत्यक्ष मतदान / मतमोजणी कर्तव्यार्थ उपस्थित राहणाऱ्या कार्यरत व राखीव अधिकारी / कर्मचारी यांना वरील तक्त्यात नमूद केलेल्या दराप्रमाणे निवडणूक भत्ता अनुज्ञेय राहील.

(३) हा निवडणूक भत्ता सार्वत्रिक तसेच पोट निवडणुकांसाठी दिला जाईल.

(४) दूर्गम प्रदेशातील (difficult terrain) मतदान केंद्रांवर संबंधित मतदान पथकास (Polling official) ३ किंवा त्याच्यापेक्षा जास्त दिवस आगोदर निघावे लागते, त्या मतदान पथकातील अधिकारी व कर्मचारी यांना सामान्य दरा पेक्षा दुप्पट दराने निवडणूक भत्ता अनुज्ञेय राहील.

(५) निवडणूक भत्त्या व्यतिरिक्त, सर्व मतदान केंद्रांवर / मतमोजणी केंद्रांवर निवडणूक संबंधित कामासाठी तैनात मतदान कर्मचाऱ्यांसह पोलिस कर्मचारी, मोबाईल पार्टीमधील कर्मचारी, होमगार्ड, वनरक्षक ग्राम रक्षक दल, NCC कॅडेट्स, माजी सैनिक, स्वयंसेवक इत्यादींसाठी पॅक केलेले दुपारचे जेवण आणि/किंवा हलका अल्पोहार प्रदान केला जाईल.

(६) उपरोक्त पध्दतीनुसार मतदान कर्मचारी / पोलीस कर्मचारी आणि निवडणूक कामासाठी नियुक्त केलेले इतर अधिकारी / कर्मचारी याना TA/DA ची अदागयी करण्यासंदर्भात प्रकरणपरत्वे मूळ विभाग अथवा निवडणूक विभाग यांच्याकडून कार्यवाही करण्यात यावी.

(७) अधिकारी / कर्मचारी यांना प्रवास भत्ता / दैनिक भत्ता (TA/DA) देताना तो त्या-त्या वेळी अनुज्ञेय असलेल्या दराने देय होईल.

३. उपरोक्त बाबींवर होणारा खर्च प्रकरणपरत्वे मागणी क्र. ए-०२, "२०१५-निवडणुका, १०५-संसदेच्या निवडणुका घेण्यासाठी लागणारा खर्च" किंवा "२०१५-निवडणुका, १०६-राज्य/संघराज्य क्षेत्र विधानमंडळ निवडणुका घेण्यासाठी लागणारा खर्च" किंवा "२०१५-निवडणुका, १०४-लोकसभा व राज्य संघराज्य क्षेत्र विधानसभा यांच्या एकास वेळेस घेतल्या जाणाऱ्या निवडणुकांचा खर्च" हया लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात भागविण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२९/व्यय-४, दि.०८.०४.२०२४ अन्वये तसेच प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४१९१२५१०२९३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्य पाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YOGESH MAHADEO GOSAVI

Digitally signed by YOGESH MAHADEO GOSAVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=409605c5c875f777d39cbf4ca29ce3d56c5c1d7c1ea54667614a049c47985d83, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D910025DFF598286A45B3B22318E6C113E071B7C6E85F3D06BECDD5995FC1966, cn=YOGESH MAHADEO GOSAVI
Date: 2024.04.19 13:03:16 +05'30'

**( योगेश गोसावी )**
**अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३. विभागीय आयुक्त (सर्व)

४. जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी (सर्व)
५. सर्व लोकसभा/विधानसभा मतदारसंघनिहाय निवडणूक निर्णय अधिकारी, (जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांचेमार्फत)
६. सर्व लोकसभा/विधानसभा मतदारसंघनिहाय सहायक निवडणूक निर्णय अधिकारी, (जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांचेमार्फत)
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. वित्त विभाग/कार्या.व्यय-४
११. कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग/का.२६, मंत्रालय, मुंबई
१२. कार्या.३३ (निवडणूक अर्थसंकल्प शाखा)
१३. निवड नस्ती.